कारागृह विभागातील अधिकारी/कर्मचारी यांना पोलीस विभागातील समकक्ष पदाची वेतनश्रेणी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्र.जेएलडी ३५९७/४९/प्र.क्र.२२९/भाग-२/पीआरएस-१.
मंत्रालय, मुंबई-४०००३२. दिनांक: १२ सप्टेंबर, २००३.

वाचा:- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे प. क्र. इएसटी/ वेतनश्रेणी/ पुन:रचना/ १९९८/ कक्ष-१, दि. २०.१.१९९८.

प्रस्तावना :- कारागृह विभाग हा गृह विभागाच्या अधिपत्याखाली कार्यरत आहे. ही आस्थापना पोलीसांप्रमाणे गणवेषधारी असून त्यांची सेवा पूर्णपणे कायदा व सुव्यवस्थेशी निगडित आहे. तथापि पोलीस दलातील कर्मचारी आणि तुरुंग आस्थापनेवरील कर्मचारी यांच्या वेतनात तफावत आहे.

२. वाढती गुन्हेगारी त्यात नवीन तंत्रज्ञानाचा वापर यामुळे कारागृहात क्षमतेपेक्षा बंद्यांची संख्या अनेक पटीने वाढलेली आहे. यामुळे तुरुंग कर्मचा-यांची जोखिम कर्तव्ये व जबाबदा-या पोलीस कर्मचा-यांप्रमाणे झाल्या आहेत. ही बाब मुंबई उच्च न्यायालयाचे मा.न्यायमुर्ती श्री.मुल्ला यांच्या अध्यक्षतेखालील अखिल भारतीय तुरुंग सुधार समितीने देखील मान्य करुन कारागृहातील अधिकारी/ कर्मचारी यांना जादा वेतन देण्याची शिफारस केली आहे. तसेच दि. १९.८.१९९३ रोजी पोलीस कर्मचारी व तुरुग कर्मचारी याचे वेतनामधील तफावत दूर करण्याची अंदाज समितीने शिफारस केली होती. मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठामध्ये न्यायाधिन बंदी श्री. सखाराम मारुती जायभाये यांनी दाखल केलेल्या क्रिमिनल रिट याचिका क्र.२८५/९९ संदर्भात मा. उच्च न्यायालयाने दि. १६.३.२००० रोजी पारीत केलेल्या अंतरिम आदेशात कमी वेतनश्रेणीमुळे कारागृह सेवेत येण्यास माणसे उत्सूक नसतात. या बाबी लक्षात घेऊन न्यायालयाने वेतनातील तफावत दूर करण्याचे निदेश दिले. त्यानुसार मंत्रिमंडळाने दि. ४.६.२००३ रोजी कारागृह विभागातील अधिकारी/ कर्मचारी यांना पोलीस विभागातील अधिकारी/ कर्मचारी यांच्या समकक्ष पदाची वेतनश्रेणी मंजूर करण्याबाबतचा निर्णय घेतला.

<u>शासन निर्णय</u> :- कारागृह विभाग हा पोलीस विभागाप्रमाणेच राज्याच्या कायदा व सुव्यवस्था यत्रणेचा एक भाग आहे. या दोन्हीही गणवेषधारी शिस्तबध्द सेवा असून त्यांची कर्तव्ये व जबाबदा-या समान असल्याने सर्वंकष विचार करुन कारागृह विभागातील अधिकारी/ कर्मचारी यांना पोलीस दलातील अधिकारी/ कर्मचारी यांच्या समकक्ष पदाची वेतनश्रेणी सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे खालील अटींच्या अधिन राहून लागू करण्यात येत आहे. सदर वेतनश्रेणी ही दि. ४.६.२००३ पासून अंमलात येईल.

१) सदर मंजूरी पोलीस दलाप्रमाणे सेवा प्रवेश नियमात सुधारणा करण्याच्या अटीच्या अधीन राहून लागू करण्यात यावी.

२) सुधारीत सेवा प्रवेश नियम अस्तित्वात येण्यापूर्वी नियुक्त झालेल्या अधिकारी/ कर्मचारी यांना सदर अट क्र.१ मधून सूट देण्यात येत आहे.

३) वाढीव खर्चाची तरतूद अर्थसंकल्पात केल्याशिवाय खर्च करु नये.

४. वाढीव खर्चाची तरतूद करण्यात आल्यानंतर त्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारी संदर्भ क. ४६८/ २००३/ सेवा-९, दि. १३.८.२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( अ. मु. झणझणे )
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक (मुंबई/ पुणे/ औरंगाबाद/ नागपूर)
सर्व कारागृह अधिक्षक
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर
अवर सचिव, कार्यासन डीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (व्यय-८) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (सेवा-९) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (पीआरएस - १)

शासन निर्णय क्र. जेएलडो ३५९७/ ४९/ २२९ (भाग-२)/ पीआरएस-१.
दिनांक: २२ सप्टेंबर, २००३ सोबतचे प्रपत्र.

## कारागृह विभागातील अधिकारी / कर्मचारी यांना पोलीस दलातील समकक्ष पदाची वेतनश्रेणी दर्शविणारे विवरणपत्र.

| अ. क्र. | कारागृह विभागातील अधिकारी / कर्मचारी यांची पदे | सध्याची वेतनश्रेणी | पोलीस दलातील धिकारी/ कर्मचारी यांची पदे | सध्याची वेतनश्रेणी | पोलीस दलातील समकक्ष पदाची वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | रक्षक/ शिपाई/ परिचारक | २६१०-४००० | पोलीस शिपाई | ३०५०-४५९० | ३०५०-४५९० |
| २ | कारागृह हवालदार | ३०५०-४५९० | पोलीस हवालदार | ४०००-६००० | ४०००-६००० |
| ३ | कारागृह सुभेदार | ३०५०-४५९० | सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक | ४५००-७००० | ४५००-७००० |
| ४ | तुरुंग अधिकारी श्रेणी-२ | ४५००-७००० | पोलीस उपनिरीक्षक | ५५००-९००० | ५५००-९००० |
| ५ | तुरुंग अधिकारी श्रेणी-१ | ५५००-७००० | स.पोलीस निरीक्षक | ६५००-१०५०० | ६५००-१०५०० |
| ६ | उपअधिक्षक वर्ग-२ | ६५००-१०५०० | पोलीस उप अधिक्षक वर्ग-२ | ७४५०-११०५० | ७४५०-११०५० |
| ७ | अधिक्षक जि.का.वर्ग-१ | ८०००-१३५०० | पोलीस अधिक्षक (समादेशक) सहाय्यक पोलीस महानिरीक्षक (असंवर्गीय) | १००००-१५२०० | १००००-१५२०० |
| ८ | अधिक्षक म.का.वर्ग-१ | १०६५०-१५८५० | पोलीस अधिक्षक | १२०००-१६५०० | १२०००-१६५०० |
| ९ | कारागृह उपमहानिरीक्षक | १२०००-१६५०० | पोलीस उप महानिरीक्षक (असंवर्गीय) | १६४००-२०००० | १६४००-२०००० |

( अ. मु. झणझणे )
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

<u>शासन निर्णय</u> :- कारागृह विभाग हा पोलीस विभागाप्रमाणेच राज्याच्या कायदा व सुव्यवस्था यत्रणेचा एक भाग आहे. या दोन्हीही गणवेषधारी शिस्तबध्द सेवा असून त्यांची कर्तव्ये व जबाबदा-या समान असल्याने सर्वंकष विचार करुन कारागृह विभागातील अधिकारी/ कर्मचारी यांना पोलीस दलातील अधिकारी/ कर्मचारी यांच्या समकक्ष पदाची वेतनश्रेणी सोबलच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे खालील अटींच्या अधिन राहून लागू करण्यात येत आहे. सदर वेतनश्रेणी ही दि. ४.६.२००३ पासून अंमलात येईल.

१) सदर मंजूरी पोलीस दलाप्रमाणे सेवा प्रवेश नियमात सुधारणा करण्याच्या अटीच्या अधीन राहून लागू करण्यात यावी.

२) सुधारीत सेवा प्रवेश नियम अस्तित्वात येण्यापूर्वी नियुक्त झालेल्या अधिकारी/ कर्मचारी यांना सदर अट क्र.१ मधून सूट देण्यात येत आहे.

३) वाढीव खर्चाची तरतूद अर्थसंकल्पात केल्याशिवाय खर्च करु नये.

४. वाढीव खर्चाची तरतूद करण्यात आल्यानंतर त्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारी संदर्भ क. ४६८/ २००३/ सेवा-९, दि. १३.८.२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( अ. मु. झणझणे )
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक (मुंबई/ पुणे/ औरंगाबाद/ नागपूर)
सर्व कारागृह अधिक्षक
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर
अवर सचिव, कार्यासन डीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (व्यय-८) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (सेवा-९) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (पीआरएस - ०)